**पणन हंगाम २०२१-२२ मध्ये खरेदी केलेल्या धानाच्या भरडाईबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक:-धानभ-१२२१/प्र.क्र./नापु २९**
**मंत्रालय विस्तार, मुंबई- ४०० ०३२**
**दिनांक : - १४ ऑक्टोबर, २०२१.**

वाचा :-

शासन निर्णय क्रमांकः खरेदी - १०२१/प्र.क्र.१३८/ ना.पु.२९ दि.३०.०९.२०२१.

शासन परिपत्रक :-

पणन हंगाम २०२१-२०२२ करिता किमान आधारभूत किंमत खरेदी योजनेअंतर्गत "विकेंद्रीत खरेदी योजना " संपूर्ण राज्यात राबविण्याचे संदर्भ क्र. १ च्या शासन निर्णयान्वये निर्देश देण्यात आले आहेत. त्यानुसार सदर योजनेंतर्गत खरेदी होणाऱ्या धानाची भरडाई खरेदीबरोबरच सुरु करणे आवश्यक आहे. धानाची भरडाई ही अभिकर्ता संस्थेने (दि महाराष्ट्र स्टेट को-ऑपरेटिव्ह मार्केटिंग फेडरेशन, मुंबई व महाराष्ट्र राज्य सहकारी आदिवासी विकास महामंडळ मर्यादित, नाशिक) केंद्र शासनाच्या विहित मापदंडानुसार करावयाची आहे.

२) भरडाईचा कालावधी :-

पणन हंगाम २०२१-२२ मध्ये खरेदीचा कालावधी दि.१ ऑक्टोबर, २०२१ ते दि. ३१ जानेवारी २०२२, तसेच दि.०१ मे २०२२ ते दि. ३० जून, २०२२ असल्यामुळे विहित मुदतीत भरडाई पूर्ण करण्याची दक्षता अभिकर्ता संस्थांनी घ्यावी. धान भरडाईचे काम लवकरात लवकर व शक्यतो धान खरेदीच्या दिनांकापासून एका महिन्यांत अथवा उशीरात उशीरा दिनांक ३० सप्टेंबर, २०२२ पर्यंत पूर्ण करावे. त्यादृष्टीने अभिकर्ता संस्थांनी आवश्यक ते पूर्वनियोजन करावे.

३) भरडाईसाठी जिल्हा समन्वय समिती :-

जिल्हाधिकारी यांनी जिल्ह्यातील अभिकर्ता संस्थांच्या मदतीने खालीलप्रमाणे जिल्हा समन्वय समिती स्थापन करण्याची कार्यवाही करावी:- :- समन्वय समिती स्थापकरण्याचीरावी

| | |
|---|---|
| जिल्हाधिकारी | अध्यक्ष |
| जिल्हा अधिक्षक कृषी अधिकारी | सदस्य |
| जिल्हा उपनिबंधक सहकारी संस्था | सदस्य |
| जिल्हा पुरवठा अधिकारी | सदस्य |
| सहायक जिल्हा पुरवठा अधिकारी | सदस्य |
| मार्केटिंग फेडरेशन /आदिवासी विकास महामंडळाचे जिल्हा व्यवस्थापक (त्यांच्या संबंधित भौगोलिक क्षेत्रानुसार) | सदस्य-सचिव. |

:-

४) जिल्हा समन्वय समितीच्या जबाबदाऱ्या :-

४.१ खरेदी केलेल्या धानाच्या भरडाईकरिता खरेदी केंद्राजवळील, सक्षम अशा गिरण्यांची नियुक्ती करणे.

४.२ शक्यतो स्थानिक गिरणीधारकांचा प्राथम्याने विचार करावा. तथापि ज्या भागामध्ये धान भरडाई गिरण्यांची संख्या कमी आहे अशा ठिकाणी लगतच्या जिल्ह्यातील गिरणीधारकांची नियुक्ती करणे व शासनाच्या हिताचे असल्यास अशा गिरणीधारकांना भरडाईचे काम देणे. लगतच्या जिल्ह्याव्यतिरिक्त धान भरडाई करावयाची असल्यास, शासन मान्यतेसाठी प्रस्ताव पाठविणे.

४.३ चालू हंगामासाठी गिरणीधारकांची नियुक्ती करताना नव्याने प्रस्ताव मागवून भरडाईचे काम देण्यास जिल्हा समन्वय समिती सक्षम राहील. तथापि, मागील हंगामातील नियुक्त केलेल्या ज्या गिरणीधारकांबाबत तक्रारी नाहीत त्या गिरणीधारकांच्या करारनाम्याचे नुतनीकरण पणन हंगाम २०२१-२२ करिता करणे व त्यांच्यामार्फत भरडाईची प्रक्रीया राबविणे.

४.४ नवीन गिरणीधारकांची नियुक्ती करताना तो गिरणीधारक असल्याबाबतचे सबळ पुरावे घेण्यात यावेत. जसे गिरणीचे उद्योग नोंदणी प्रमाणपत्र,कृषि उत्पन्न बाजार समितीचे प्रक्रीयादार असल्याचे प्रमाणपत्र, गिरणीच्या नावाचे मागील ३ महिन्यांचे विद्युत देयक, मागील ३ वर्षाचे अंकेक्षण अहवाल (ज्यामध्ये निव्वळ मूल्य अधिक्य असावे), वस्तु व सेवा कर नोंदणी प्रमाणपत्र व मागील कोणत्याही हंगामाचे धान / तांदुळ (Custom Milled Rice CMR) बाकी नाही व शासनाला कोणतीही रक्कम देय नाही, अशा आशयाचे ₹ ५००/- च्या स्टॅम्प पेपरवर प्रतिज्ञापत्र घेण्यात यावे.ज्या गिरणीधारकांना काळ्या यादीत टाकण्यात आले आहे तसेच ज्यांच्याकडे मागील हंगामाचे धान / तांदुळ (CMR) शिल्लक आहे, अशा मिलर्सला भरडाईचे काम देण्यात येऊ नये.

अ. ज्या गिरणीधारकांनी नव्याने गिरणी सुरु केली आहे. त्या गिरणीधारकांकडे मागील वर्षाचे "अंकेक्षण अहवाल" उपलब्ध होऊ शकणार नसल्याने त्या गिरणीधारकांकडून अंकेक्षण अहवालाची अट अनिवार्य करण्यात येऊ नये. तसेच गिरणीमध्ये धान भरडाई सुरु झाल्यानंतरच्या कालावधीपासूनचे वीज देयक वीज कंपनीकडून प्राप्त झाल्यानंतर त्या गिरणीधारकांकडून उपलब्ध करुन घेणे.

आ. जे गिरणीधारक केवळ सॉरटॅक्स अथवा पॅराबॉईल्ड याच प्रकारचे काम करत असेल तर त्या मिलर्सना धानाच्या भरडाईचे काम देण्यात येऊ नये.

४.५ ज्या गिरणीधारकांवर गुन्हा दाखल झाला असेल अशा गिरणीधारकांस भरडाईचे काम देण्याबाबत सर्व कागदपत्रांची छाननी करुन त्याबाबतचा निर्णय जिल्हा समन्वय समितीने घ्यावा.

४.६ धानाची भरडाईसाठी उचल करणे तसेच, धान भरडाई करुन तांदुळ (CMR) शासकीय गोदामामध्ये जमा करणे याचा कालबध्द कार्यक्रम आखणे.

४.७ भरडाई सुरु होण्यापूर्वीच जिल्ह्यातील खरेदीचा अंदाज घेऊन, तयार होणारा सीएमआर जमा करण्याकरिता जिल्ह्यातील उपलब्ध गोदाम क्षमता विचारात घेऊन, आवश्यक अतिरिक्त गोदामांचा प्रस्ताव शासन पत्र दिनांक २७ डिसेंबर,२०१९ अन्वये दिलेल्या सूचनांची पूर्तता करित असल्यास, शासनास सादर करणे. आवश्यकतेपेक्षा जास्तीची गोदामे भाड्याने घेतली जाणार नाहीत याची दक्षता घेणे. खाजगी गोदामे भाडयाने घेताना वर्षभर वाहनांची वाहतूक सुरळीत राहील अशीच गोदामे भाडयाने घेणे.

४.८ सीएमआरच्या गुणवत्ता तपासणीसाठी पुरेशा प्रशिक्षित गुणवत्ता नियंत्रकांची नियुक्ती करणे. तसेच त्यांच्या नियुक्त्या चक्राकार पध्दतीने (Rotational Transfer) करणे.

४.९ भरडाईबाबत गिरणीधारकांविरुध्द तक्रारी असल्यास सुनावणी घेऊन निर्णय देणे. समितीचा निर्णय मान्य नसल्यास गिरणीधारकांस संबंधित विभागीय आयुक्त यांच्याकडे अपील दाखल करता येईल.

४.१० केंद्र शासनाच्या निदेशांप्रमाणे खरेदी झालेल्या धानाची भरडाई विहित मुदतीत होणे आवश्यक आहे. खरेदी केलेले धान उघड्यावर अथवा गोदामांमध्ये २ महिन्यांहून अधिक काळ शिल्लक राहणार नाही याची दक्षता घेणे. तशी परिस्थिती उद्भवल्यास लगतच्या जिल्ह्यांतील गिरणीधारकांकडून केंद्र शासनाने विहीत केलेल्या मर्यादेतच वाहतूक होईल याची खात्री करुन भरडाई करुन घेणे.

४.११ जिल्हा समन्वय समितीने त्यांची आढावा बैठक दर १५ दिवसांनी घ्यावी. CMR दावे प्रतिपूर्तीची रक्कम मुद्दा क्र. ६.७ मध्ये नमूद स्वीय प्रपंजी लेखा खात्यामध्ये वर्ग केली जात असल्याबाबत पाक्षिक आढावा घेणे व सदर अहवाल शासनास सादर करणे बंधनकारक राहील.

**५) अभिकर्ता संस्थेची जबाबदारी:-**

५.१ नियुक्त करण्यात आलेल्या गिरणीधारकांच्या भरडाई क्षमतेबाबतची माहिती अभिकर्ता संस्थांनी जिल्हा समन्वय समितीस देणे. त्यानुसार मिलर्सना धान भरडाईसाठी लॉट देण्याची कार्यवाही करणे.

५.२ काळ्या यादीत समाविष्ट केलेल्या गिरणीधारकांची यादी संबंधित जिल्ह्यांच्या जिल्हाधिकारी यांना नवीन हंगामाच्या गिरणीधारकांची नियुक्ती होण्यापुर्वी पाठविणे.

५.३ चालू हंगामाकरीता गिरणीधारक, अभिकर्ता संस्था व जिल्हा पुरवठा अधिकारी यांचा त्रिपक्षीय करारनामा करणे. चालू हंगामात मिलर्ससोबत करारनामा करताना सदर करारात मिलर्सनी शासनाचे धान प्राधान्याने मिलींग करून द्यावे. त्याचप्रमाणे मिलर्सकडून खराब सीएमआर (CMR) जमा केला गेल्यास तसेच मिलींग करण्यास मिलर्सने दिरंगाई केल्यास संबंधित मिलर्सवर जिल्हाधिकारी यांनी त्यांच्या स्तरावर

जीवनावश्यक वस्तू कायदा (EC Act), आपत्ती व्यवस्थापन कायदा तसेच इतर अस्तित्वात असलेल्या कायद्यानुसार दंडात्मक कारवाई करावी, या तरतूदींचा प्रामुख्याने समावेश करावा.

५.४ धान खरेदी करुन, खरेदी केलेल्या धानाची भरडाई करुन, सीएमआर (CMR) संबंधित गिरणीधारकांमार्फत विहित शासकीय गोदामात जमा करणे.

५.५ उपरोक्त मुद्दा क्र. ४.६ चे पालन गिरणीधारकांकडून न झाल्यास, त्याचप्रमाणे तांदुळ (CMR) विहित गोदामांत जमा न केल्यास/विलंबाने जमा केल्यास तसेच शासनाशी करारनामा केल्यानंतर धानाची भरडाई प्राधान्याने न केल्यास अशा बाबींबाबत त्रिपक्षीय करारनाम्यामध्ये दंडात्मक कारवाईची तरतूद अंतर्भूत करणे.

५.६ धानाचे वितरण आदेश (D.O.) धान खरेदी केलेल्या दिनांकापासून सात दिवसांच्या आत नियुक्त केलेल्या गिरणीधारकास देणे.

५.७ पणन हंगाम २०२१-२२ मध्ये गिरणीधारकांना धान भरडाईकरिता देताना गिरणीच्या भरडाई क्षमतेच्या प्रमाणात अभिकर्ता संस्थांकडून धानाचे लॉट भरडाईकरिता देण्याची कार्यवाही करणे. गिरणीच्या क्षमतेपेक्षा जास्त धान भरडाईकरिता गिरणीधारकास देण्यात येऊ नये.

५.८ अभिकर्ता संस्थांनी प्रत्येक आठवड्याच्या अखेरीस भरडाईसाठी दिलेले धान व शासकीय गोदामात जमा केलेला सीएमआर यांचे एकत्रित जिल्हानिहाय विवरणपत्र पोच पावतीसह (Acceptance Receipt) वित्तीय सल्लागार व उप सचिव, मुंबई यांना पाठविणे.

५.९ गिरणीमालकाने धानाची भरडाई करुन तांदूळ (CMR) शासकीय गोदामात जमा केल्यानंतर गोदामपालाने NeML च्या संगणकीय प्रणालीवर त्याबाबत घेतलेल्या नोंदीच्या आधारे पुढील धान गिरणीधारकांस उपलब्ध करुन देणे.

५.१० अभिकर्ता संस्थेने धान भरडाईसाठी गिरणीधारकांकडे सोपविताना खालीलप्रमाणे प्राथम्यक्रम असावा.

अ. उघड्यावर साठविलेले (अपवादात्मक स्थितीत असल्यास) असे धान.

आ. खाजगी गोदामात साठविलेले धान.

इ. सहकारी संस्थांच्या गोदामात साठविलेले धान.

ई. शासकीय /अभिकर्ता संस्थांच्या गोदामात साठविलेले धान.

वरील अ ते ई मध्ये साठविलेले धान, पहिल्यांदा खरेदी झालेला धान प्रथम भरडाई होईल (First In First Out) या धर्तीवर भरडाईसाठी मिलर्सना देणे व महिनानिहाय साठा विवरणपत्रे ऑनलाईन अद्ययावत ठेवणे.

५.११ धान भरडाईनंतर जास्तीत जास्त तांदुळ (C.M.R) (म्हणजेच किमान ६७% किंवा त्यापेक्षा अधिक तांदूळ) जमा करण्यास तयार असणाऱ्या गिरणीमालकांना प्राधान्य देणे.

५.१२ करारनाम्याप्रमाणे गिरणीमालकांकडून बँक गॅरंटी घेणे.

५.१३ धान भरडाईसाठी देताना गिरणीधारकाची भरडाई क्षमता (Milling capacity) व वाहतूकीसाठी जवळच्या अंतराचा प्रामुख्याने विचार करावा.

५.१४ गिरणीधारकाची भरडाई क्षमता लक्षात घेऊन त्याला पूर्ण हंगामात किती धान दिले जाईल व हे दिलेले धान हंगामापूर्वी विहित मुदतीत भरडाई करुन दिले जाईल याची हमी गिरणीधारकाकडून घेणे.

५.१५ गिरणीधारकाने NeML च्या प्रणालीवर योग्य नोंदी घेतल्या आहेत किंवा कसे याचा आढावा अभिकर्ता संस्थांनी घेणे. नोंदी न घेतलेल्या गिरणीमालकावर कारवाई करणे.

५.१६ कार्यरत खरेदी केंद्र, त्याची खरेदी क्षमता, त्या केंद्राला जोडण्यात आलेले भरडाईचे उद्दिष्ट, तसेच मिलर्सची संख्या व त्यांच्या मिलची भरडाई क्षमता इत्यादी बाबतची माहिती नियंत्रण कक्षाला देणे.

५.१७ गिरणी मालकाने भरडाई केलेला तांदुळ (C.M.R) शासकीय गोदामात जमा करणे व देयक सादर करताच, अभिकर्त्या संस्थेने १० दिवसात, भरडाई खर्च विहित दराने गिरणीमालकास देणे.

५.१८ अभिकर्ता संस्था यांनी धान वाहतुकीचे देयक वित्तीय सल्लागार व उपसचिव यांच्या कार्यालयास सादर करतांना जवळच्या मिलकरीता व जवळच्या मार्गाने वाहतूक केल्याबाबतचे प्रमाणपत्र देणे आवश्यक राहील.

५.१९ भरडाईचा कालावधी संपल्यानंतर जर अभिकर्ता संस्थांकडे धान शिल्लक राहिले तर शिल्लक धानाची संपूर्ण जबाबदारी अभिकर्ता संस्थांची राहील. सदर धानाच्या खरेदीचा व इतर कोणताही अनुषंगीक खर्च अभिकर्ता संस्थांना अनुज्ञेय नसेल. तसेच, सदर धानापासून जेवढा तांदुळ (CMR) झाला असता तेवढया तांदळाची केंद्र शासनाने त्या त्या कालावधीसाठी निश्चित केलेल्या इकॉनॉमिक कॉस्टच्या दराने होणारी रक्कम अभिकर्ता संस्थांना शासनास जमा करावी लागेल. अशी सर्व रक्कम जमा होईपर्यंत अभिकर्ता संस्थांचा प्रशासकीय/अनुषंगिक खर्च प्रदान केला जाणार नाही. तसेच भरडाईविना शिल्लक राहिलेल्या धानाचा कोणताही अनुषंगिक खर्च अभिकर्ता संस्थांना देय होणार नाही. केंद्र शासनाने निश्चित करुन दिलेल्या कालावधीत भरडाई पूर्ण करुन घेण्याची जबाबदारी अभिकर्ता संस्थांची राहील.

**६)** जिल्हा पुरवठा अधिकारी यांच्या जबाबदाऱ्याः-

६.१ वितरण आदेश दिल्याच्या दिनांकापासून धानाची भरडाई करुन सीएमआर १० दिवसांत शासनाच्या विहीत केलेल्या गोदामात जमा होत आहे, याची खात्री करणे.

६.२ शासनाच्या विहीत केलेल्या गोदामात सीसीटीव्ही यंत्रणा लावणे बंधनकारक राहिल. सदर कॅमेरे अशा ठिकाणी लावावेत जेणेकरुन जमा होणारा तांदुळ, वाटप करण्यात येणारा तांदुळ, वाहतुकीचे ट्रक इत्यादीचे स्पष्टपणे चित्रीकरण होईल. दर १५ दिवसांनी सदर चित्रीकरण पेनड्राईव्हमध्ये कॉपी करणे आवश्यक राहील व त्याची तपासणी करण्यासाठी स्वंतत्र कक्ष स्थापन करणे. सदर तपासणीच्यावेळी चित्रीकरण केलेला पेनड्राईव्ह उपलब्ध करुन देणे. शासकीय गोदामांमध्ये कॅमेरा लावण्याचा खर्च केंद्र शासनाकडून मंजूर करण्यात येणाऱ्या प्रशासकीय खर्चातून भागविण्यात यावा व त्याची देयके वित्तीय सल्लागार व उप सचिव कार्यालयास सादर करणे.

६.३ सीएमआर स्वीकृतीकरिता जिल्ह्यातील भाडयाने घेण्यात आलेल्या गोदामांची माहिती शासनास तसेच NeML पोर्टलवर उपलब्ध करुन देणे.

६.४ शासकीय गोदामात सीएमआर प्राप्त झाल्यानंतर व तो नियतनासाठी पाठविल्यानंतर गोदामपालाकडून त्याच्या संगणकीय अद्ययावत नोंदी NeML च्या प्रणालीवर घेण्यात आल्या आहेत किंवा कसे याचा आढावा घेणे. अशा नोंदी अद्ययावत नसल्यास गोदामपालावर कारवाई करणे.

६.५ मुद्दा क्र. ५.१ प्रमाणे होणाऱ्या कार्यवाहीवर नियंत्रण ठेवणे.

६.६ मुद्दा क्र ५.९ .नुसार धान भरडाईसाठी दिला जातो किंवा कसे याबाबत आढावा घेणे.

६.७ सी.एम.आर. चे सार्वजनिक वितरण व्यवस्थेत वाटप केल्याच्या दिनांकापासून तीन दिवसांत सी.एम.आर. प्रतिपुर्ती दावे वित्तीय सल्लागार व उपसचिव यांना fadsmumbai.mhpds@gov.in या ई-मेलवर ऑनलाईन सादर करणे. सदरची माहिती कार्यासन नापु २२, अन्न नागरी पुरवठा विभाग मंत्रालय, मुंबई ३२ यांनाही देणे. त्यामध्ये सीएमआर/तांदळाच्या विक्रीतून येणारी रक्कम वित्तीय सल्लागार व उपसचिव कार्यालयाच्या स्वीय प्रपंजी लेख्यांच्या (PLA) खात्यावर जमा करणे. सदर खाते क्रमांकांचा तपशिल खालीलप्रमाणे नमूद करण्याबाबत सूचना द्याव्यात.

"RBI PLA A/c- 4408 FAIR PRICE SHOP SCHEME, RESERVE BANK OF INDIA, FORT, PAD MUMBAI खाते क्र. 01514501075, IFSC Code-RBISOMBPA04"

त्याचप्रमाणे सी.एम.आर. ची उचल केल्यानंतर त्यांची नोंद गुगल शीट मध्ये घेणे.

**७) गिरणीमालकांची जबाबदारी :-**

७.१ पणन हंगाम २०२०-२१ मध्ये भरडाईसाठी नियुक्त असलेल्या गिरणीधारकांनी पणन हंगाम २०२१-२२ हंगामासाठी त्वरित त्रिपक्षीय करार करुन घेणे.

७.२ अभिकर्ता संस्था/डीएमओ/आरएमओ यांनी मिलर्सला वितरण आदेश (DO) दिल्यावर गिरणी मालकाने धानाची ७ दिवसांच्या आत उचल करणे आणि त्यानंतर १० दिवसांत भरडाई झालेला तांदुळ (C.M.R) शासकीय गोदामात जमा करणे. अन्यथा गिरणीमालक शासनाने विहित केलेल्या प्रमाणात दंडास पात्र राहील.

७.३ उचल केलेल्या धानाची वाहतूक करणे, गिरणीमधील सुरक्षित धानाची साठवणूक करणे, तांदुळ (C.M.R) वजन करुन वाहनामध्ये भरणे. त्यासाठी, ते प्रसंगी विमा उतरवतील. मात्र त्यासाठी शासनाकडून खर्च दिला जाणार नाही.

७.४ गिरणीमध्ये आवक झालेले धान तसेच गोदामामध्ये पाठविण्यात आलेला तांदुळ (C.M.R) यांचा NeML च्या प्रणालीवर अद्ययावत नोंदी ठेवणे. नोंदी अपूर्ण राहिल्यास भरडाई वाहतुक इ.ची अदायगी करण्यात येणार नाही.

७.५ संबंधित गिरणीमालकाने तांदुळ (C.M.R) जमा केल्याची पोहोच (Acceptance Receipt) लगेच व उशिरात उशिरा दोन दिवसांत अभिकर्ता संस्थेकडे जमा करणे.

७.६ भरडाई केंद्रावर भारतीय खाद्य महामंडळाच्या (FCI) निर्देशानुसार २७ मे.टन चा लॉट बनविणे.

७.७ भरडाई केंद्रावर सी.सी.टी.व्ही. कॅमेरा लावून त्याचे रेकॉर्डिंग पेनड्राईव्हमध्ये सुरक्षित ठेवावे. सदर रेकॉर्डिंग मागणी केल्यास शासनास उपलब्ध करुन देणे. असे चित्रीकरण उपलब्ध करुन न दिल्यास सदर भरडाई केंद्र रद्द करण्यास पात्र राहील.

७.८ **धान व सी. एम. आर. च्या वाहतूकीची जबाबदारी:-**

खरेदी केंद्रावर खरेदी करण्यात आलेल्या धानाची वाहतूक करुन ते धान गिरणीमध्ये नेण्याची व भरडाईअंती प्राप्त झालेला तांदुळ (C.M.R) विहीत केलेल्या शासकीय गोदामापर्यंत पोहचविण्याची सर्वस्वी जबाबदारी गिरणी मालकाची राहील.

७.९ भरडाई दरम्यान मिळणारा ब्रान, भूसा इत्यादी सर्व उत्पादने गिरणीमालकाकडे राहतील. त्यासाठी कोणतीही रक्कम त्यांचेकडून वसूल केली जाणार नाही.

७.१० भरडाई करताना रबरी रोलरने ५% ते ७% पॉलिश अपेक्षित आहे.

७.११ केंद्र शासनाने हंगाम २०२१-२२ साठी ठरविलेल्या विनिर्देशात बसणारा तांदुळ (C.M.R) असणे बंधनकारक आहे. (जोडपत्र क्र.६ व ७) याप्रमाणे तांदुळ (C.M.R) जमा न केल्यास सदरचा तांदुळ (C.M.R) बदलून (replacement) देणे. ही कार्यवाही तक्रार प्राप्त

झाल्यापासून ७ दिवसांच्या आत गिरणीमालकाने न केल्यास चालू हंगामात त्यांना पुढील काम देण्यात येऊ नये.

८. पणन हंगाम २२-२०२१ मध्ये धानाच्या भरडाईसाठी खालील सूचना केंद्र शासनाच्या आदेशांच्या अधिन राहून देण्यात येत आहेत. केंद्र शासनाचे यासंदर्भातील सर्व आदेश अभिकर्ता संस्थेवर व गिरणीधारकांवर बंधनकारक राहतील.

८.१ **उतारा-:**

एक क्विंटल धानाच्या भरडाईतून कमीत कमी ६७% (६७ किलो) तांदूळ (सी.एम.आर.) प्राप्त झाला पाहिजे.

८.२ **धानाची भरडाई:-**

राज्यात सार्वजनिक वितरण व्यवस्थेअंतर्गत तांदूळ वितरीत होत असल्यामुळे, आधारभूत किंमत खरेदी योजनेअंतर्गत खरेदी केलेल्या धानाची तांदळासाठी (सी.एम.आर.) भरडाई करण्याची कार्यवाही प्राथम्याने करावी.

८.३ **भरडाईचा दर**:-

केंद्र शासनाकडून निश्चित करण्यात आलेले भरडाई दर सन २०२१-२२ या हंगामासाठी लागू राहतील.

८.४ **धानाची हाताळणूक:**

धान गिरणीमधील धानाची उतराई, हाताळणूक व भरडाई, तसेच केंद्र शासनाने पणन हंगाम २०२१-२२ करिता बारदान्यांकरिता निश्चित केलेल्या निकषांमध्ये बसणाऱ्या गोण्यांमध्ये, दुहेरी शिलाईसह, तांदुळ (C.M.R) भरणे, तसेच तांदुळ (C.M.R) वजन करुन वाहनामध्ये भरण्याची जबाबदारी गिरणी मालकाची असेल.

९. **बारदाना :-**

पणन हंगाम २०२१-२२ मध्ये, बारदाना खरेदी व वापराबाबत शासन निर्णय, क्रमांक: खरेदी १०२१ /प्र.क्र.१३८/नापु २९, दि. ३०.९.२०२१मध्ये नमूद अटी शर्तीनुसार कार्यवाही करावी. तसेच वित्तीय सल्लागार व उपसचिव कार्यालयाकडून जुन्या व नव्या बारदान्यासंदर्भात वेळोवेळी देण्यात येणाऱ्या सूचनांचे पालन दोन्ही अभिकर्ता संस्थांनी करावे.

तसेच बारदान्याच्या कलर कोडींग (जोडपत्र क्र. २) बाबत शासन निर्णय, क्रमांक: खरेदी १०२१/प्र.क्र. १३८/नापु २९, दि. ३०.९.२०२१ मधील सूचनांचे पालन करावे. त्याचप्रमाणे यापूर्वी खरेदी केलेल्या नवीन व जुन्या बारदान्याचा हिशोब शासनास सादर करण्याची जबाबदारी अभिकर्ता संस्थांची राहील.

केंद्र शासनाचे परिपत्रक No.१५-१४/२०१८/Py.III, दि. १३.१२.२०१८ अन्वये धान/CMR साठवणूकीकरिता वापर करावयाचा जुना/नवीन बारदानाबाबतचे सूचनांचे पालन करण्याची जबाबदारी अभिकर्ता संस्थांची असेल. तसेच भरडाईअंती CMR जमा केल्यापासून ७ दिवसांच्या

आत गिरणीधारकांकडून बारदानाबाबत हिशोब पूर्ण करुन नियमानुसार शिल्लक बारदाना प्राप्त करुन तो धान खरेदीकरिता उपयोगात आणण्याबाबतची जबाबदारी अभिकर्ता संस्थांची राहील.

१०. **तांदुळ (C.M.R.) स्विकृतीचा आगाऊ कार्यक्रम :-**

दोन्ही अभिकर्ता संस्था व जिल्हाधिकारी यांनी संयुक्तपणे नियुक्त केलेले गिरणीमालक पुढील आठवडयाचे प्रत्येक तारखेस तांदळाची (C.M.R) किती वाहने विहित शासकीय गोदामात जमा करण्यासाठी पाठविणार यांची आगावू माहिती (गिरणीनिहाय अग्रीम कार्यक्रम) जिल्हा पुरवठा अधिकारी यांना द्यावी व त्यासाठी संबंधितांची त्वरीत मान्यता (Confirmation) घ्यावी व अशा मान्यतेनुसार त्या-त्या तारखेस ठरविल्यानुसार वाहने पाठवावीत. अशा मान्य झालेल्या कालबध्द कार्यक्रमानुसार गिरणीनिहाय तांदुळ (C.M.R) संबंधित गिरणीमालकामार्फत विहित शासकीय गोदामात जमा करण्यात यावा. ज्या प्रकरणी जिल्हा पुरवठा अधिकारी यांच्याकडून तांदुळ (C.M.R) जमा करून घेण्यास विलंब झालेला आहे, अशा प्रकरणी संबंधित जिल्हा मार्केटिंग अधिकारी/ प्रादेशिक व्यवस्थापक यांनी विनिर्दिष्टपणे प्रकरणनिहाय नोंद ठेवावी. अशी कार्यवाही केल्यामुळे ज्या प्रकरणी गिरणीमालकाच्या चुकीशिवाय तांदुळ (C.M.R) जमा करण्यास विलंब झालेला असेल, अशा प्रकरणी गिरणीमालकावर दंडात्मक कारवाई होणार नाही. मात्र, ज्या प्रकरणी विलंबाने तांदुळ (C.M.R) जमा करण्यास गिरणीमालक जबाबदार असेल अशा प्रकरणी गिरणीमालकावर तांदुळाच्या (C.M.R) किंमतीच्या द.सा.द.शे.१५% दराने व्याज आकारणी करण्यात यावी. असा दंड/ व्याजाची वसुली असल्यास संबंधित अभिकर्त्यांनी ही वसुली करुन वित्तीय सल्लागार व उपसचिव यांच्याकडे जमा करावी. यासंदर्भात दिनांकनिहाय देऊ केलेली वाहने, जिल्हा पुरवठा अधिकारी यांनी मान्यता दिलेली वाहने, प्रत्यक्षात पाठविलेली वाहने, जिल्हा पुरवठा अधिकारी यांनी स्विकारलेली वाहने व शिल्लक वाहने यांची माहिती दर आठवडयास अभिकर्ता संस्थांनी जिल्हाधिकाऱ्यांना व शासनास न चुकता ऑनलाईन सादर करावी.

११. संबंधित गिरणीमालकाने तांदुळ (C.M.R) जमा केल्याची पोहोच लगेचच किंवा उशिरात उशिरा दोन दिवसांत अभिकर्ता संस्थांकडे जमा करावी. खरेदी केलेल्या धानाची भरडाई करुन तयार होणारा तांदुळ (C.M.R) जमा केल्याबाबतची पोहोच देताना जिल्हा पुरवठा अधिकारी/सहायक जिल्हा पुरवठा अधिकारी यांनी तांदुळ (C.M.R) प्रत्यक्षपणे राज्य शासनाच्या विहित गोदामांत जमा झाल्याची खात्री करावी. जिल्हा पुरवठा अधिकाऱ्याने नियुक्त केलेल्या गुणवत्ता नियंत्रकाने प्रतिदिन तांदुळाच्या (C.M.R) किमान १५ लॉटची ऑनलाईन नोंदणी घेणे आवश्यक राहील. मात्र, सदर योजनेअंतर्गत खरेदी केलेल्या धानाची भरडाई करुन तांदुळ (C.M.R) विहित शासकीय गोदामात जमा करण्याबाबतची संपूर्ण जबाबदारी अभिकर्ता संस्थांचीच राहील.

अभिकर्ता संस्थांनी प्रत्येक आठवडयाच्या अखेरीस भरडाईसाठी दिलेले धान व विहित शासकीय गोदामात जमा केलेल्या तांदळाचे (C.M.R) एकत्रित विवरणपत्र पोच पावतीसह (जोडपत्र क्र. १ व ४)जिल्हानिहाय वित्तीय सल्लागार व उप सचिव, मुंबई यांच्याकडे पाठवावे तसेच त्याची प्रत संबंधित जिल्हाधिकारी कार्यालयास

पाठवावी. अभिकर्ता संस्थांनी सादर केलेले एकत्रित विवरणपत्र व पोच पावतीच्या आधारे भरडाई खर्चाची प्रतिपूर्ती वित्तीय सल्लागार व उप सचिव, मुंबई यांनी करावी. अभिकर्ता संस्थांमार्फत सी.एम.आर. शासकीय गोदामात जमा केल्यास सी.एम.आर. दाव्यांच्या प्रतिपूर्तीसाठी, अभिकर्ता संस्थेने वरीलप्रमाणे कार्यवाही करावी.

**१२. बँक गॅरंटी व इसारा रक्कम -**

१२.१ **इसारा रक्कम व अनामत रक्कम-**

भरडाईसाठी तयार असलेल्या गिरणीधारकांकडून रुपये ५०,०००/- इसारा रक्कम तसेच, अशा गिरणीधारकांना एकूण भरडाईसाठी मंजूर केलेल्या धानासाठी लागणारा भरडाई खर्च अधिक धान भरडाईसाठी होणारा अंदाजित वाहतूक खर्च या दोहोंच्या एकूण किंमतीच्या ५% अनामत रक्कम अभिकर्ता संस्थेकडे राष्ट्रीयीकृत बँकेच्या नावे, धनादेशाद्वारे किंवा ऑनलाईन जमा करणे आवश्यक राहील.

१२.२ अभिकर्ता संस्थांनी सर्व गिरणीधारकांकडून किमान एक वर्षासाठी राष्ट्रीयीकृत (Nationalized) अथवा अनुसूचित (Scheduled) बँकेची बँक गॅरंटी घ्यावी व अंतिम हिशोब पूर्ण होईपर्यंत बँक गॅरंटीची मुदत आणि वैधता (Validity) पुरेशी व वेळीच वाढवून घ्यावी.

१२.३ गिरणी धारकांनी सादर केलेली बँक गॅरंटीची सत्यता संबंधित बँकेकडून पडताळून घेणे अभिकर्ता संस्थांना अनिवार्य राहील.

१२.४ गिरणीधारकास बँक गॅरंटी अभिकर्ता संस्थेकडे करारनामा करण्यापूर्वी द्यावी लागेल.

१२.५ सुरक्षा अनामत व बँक गॅरंटी, भरडाईचा व्यवहार पूर्ण झाल्यावर परत करण्यात येईल, त्यावर व्याज अनुज्ञेय असणार नाही.

१२.६ गिरणीधारकांकडून केंद्र शासनाने संबंधित हंगामाकरिता विहित केलेल्या Cost Sheet मधील तांदळाच्या (C.M.R.) Acquisition Cost च्या ६७% एवढ्या निश्चित केलेल्या रक्कमेनुसार त्यांना देण्यात येणाऱ्या लॉटच्या प्रमाणात बँक गॅरंटी म्हणून जमा करून घ्यावी.

(बँक गॅरंटी = (acquisition cost of 1 quintal of rice as per cost sheet for KMS 2021-22 X 67/100) X Number of lots to be issued to miller + सदर मिलर्सकडून घेतलेली इसारा व अनामत रक्कम)

१२.७ बँक गॅरंटी ऐवजी एफडीआर/टीडीआर घेता येईल. तो बँक गॅरंटीच्या मुल्याएवढाच असला पाहिजे. तसेच तो एफडीआर/टीडीआर अभिकर्ता संस्थेच्या नावे व पुरेशा कालावधीचा आणि अभिकर्ता संस्थेच्या ताब्यामध्ये असावा.

१३. धानाचा /तांदळाचा (C.M.R) अपहार झाल्यास संबंधितांवर गुन्हे दाखल करण्यास किंवा धानाची उचल, भरडाई व सी.एम.आर. जमा करण्यास विलंब झाल्यास भरपाई वसूल

करण्याची कारवाई अभिकर्ता संस्थांनी जागरुकतेने वेळीच करावी, असे न झाल्यास अभिकर्ता संस्थेतील संबंधितांना व्यक्तिगतरित्या जबाबदार धरण्यात येईल.

१४. सी.एम.आर. जमा करताना तूट आल्यास, सी.एम.आर. च्या ठरविलेल्या दरापेक्षा सव्वापट रक्कम अभिकर्ता संस्थांनी गिरणीधारकांकडून वेळीच वसुल करुन शासनाकडे भरावी.

१५. सन २०२१-२०२२ या हंगामात धान भरडाईसाठी दि. ३० सप्टेंबर, २०२२ पर्यंत मुदत विहित करण्यात आली आहे. भरडाईमध्ये होणारा विलंब टाळण्याच्या दृष्टीने खरेदी पाठोपाठ भरडाईच्या कार्यवाहीस सुरुवात करण्यात यावी. शासन स्तरावरुन कोणत्याही परिस्थितीत वाढीव मुदतीसाठी केंद्राकडे विनंती करण्यात येणार नाही, या बाबींचा अत्यंत गांभिर्याने विचार करुन दिलेल्या मुदतीतच भरडाई पूर्ण करुन सी.एम.आर. संबंधित गिरणीधारकांमार्फत विहित शासकीय गोदामात जमा करणे बंधनकारक राहील.

१६. धान भरडाईचे काम विहीत कालावधीत पूर्ण करण्यात न आल्यास अशा गिरणीधारकांसमवेत करण्यात आलेला करारनामा रद्द करण्याचे पूर्ण अधिकार अभिकर्ता संस्थेच्या व्यवस्थापकीय संचालकांना राहतील. गिरणीधारकांसमवेत झालेला करारनामा रद्द करताना इसारा रक्कम व अनामत रक्कम जप्त करुन अभिकर्ता संस्थांनी तात्काळ शासन जमा करावी. तसेच, गिरणीधारकांकडे शिल्लक असलेल्या धानाची व सी.एम.आर. ची रक्कम संबंधित गिरणीधारकांच्या बँक गॅरंटीतून वसूल करुन शासन जमा करावी.

१७. खरेदी अभिकर्ता संस्थांनी धान भरडाई गिरण्यांना वेळोवेळी भेटी देवून भरडाई कामाची तपासणी करावी व परिणामकारक नियंत्रण ठेवावे. जिल्हाधिकारी, जिल्हा पुरवठा अधिकारी किंवा सहायक जिल्हा पुरवठा अधिकारी यांनी सुध्दा वेळोवेळी झालेल्या कामाचा आढावा घ्यावा.

१८. केंद्र शासनाच्या सुचनेनुसार व विनिर्देशात बसणारा (F.A.Q.) सी.एम.आर.विहित कालमर्यादेत जे गिरणीधारक जमा करणार नाहीत, त्यांची नांवे काळया यादीमध्ये टाकण्यात येतील, ही अट करारनाम्यात समाविष्ट करण्यात यावी. वरील सूचनांव्यतिरिक्त खरेदी अभिकर्ते यांना योग्य वाटतील, अशा इतर अटी व शर्तीचा समावेश करारनाम्यात करण्यास पूर्णत: मुभा राहील.

१९. अभिकर्ता संस्थांनी भरडाईचे काम तातडीने पूर्ण करुन खरेदी व भरडाईसह अंतिम खर्चाचे हिशेब केंद्र शासनाच्या दिनांक १९.८.२०१५ च्या पत्रातील सुचनेप्रमाणे आवश्यक कागदपत्रे व पुराव्यासह वित्तीय सल्लागार व उप सचिव यांचेकडे खरेदी हंगाम संपताच सहा महिन्याच्या विहित कालावधीत सादर करणे आवश्यक आहे.

२०. उपरोक्त सूचनांच्या आधारे अनुषंगिक खर्च अंतिम करण्याचा प्रस्ताव केंद्र शासनाकडे मंजूरीसाठी सादर केला जाईल व मंजूरीनंतर अभिकर्ता संस्थाना अनुषंगिक खर्च अंतिमरित्या मंजूर केला जाईल.

उपरोक्त मार्गदर्शक सूचनांस अनुसरुन, गिरणीधारकांसमवेत करारनामा करणे व भरडाई करुन सी.एम.आर. जमा करणे ही कामे संबंधित अभिकर्ता संस्थांनी तातडीने विहित मुदतीत पूर्ण करावीत व त्यासंबंधीचा साप्ताहिक प्रगती अहवाल शासनास सादर करावा.

२१. **वाहतूक :-**

किमान आधारभूत किंमत खरेदी योजनेंतर्गत धान व तांदळाची (CMR) वाहतूक करण्याकरिता केंद्र शासनाच्या निदेशांनुसार शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण - २६१९/प्र.क्र.८४/ना.पु.२९ दिनांक १६ ऑगस्ट, २०१९ नुसार गठीत करण्यात आलेल्या समितीकडून निश्चित करण्यात आलेल्या वाहतूकीच्या दरसूचीनुसार (SOR) जिल्हाधिकारी यांनी कार्यवाही करावी.

२२.**भरडाईसंदर्भात NeML व PFMS पोर्टलवर ऑनलाईन माहिती भरण्याबाबत**-

२२.१ केंद्र शासनाने दि. ७ ऑक्टोबर, २०१३ च्या पत्रान्वये दिलेल्या निदेशानुसार खरेदी व भरडाईची माहिती Public Fund Monitoring System (PFMS)/NeML Portal मध्ये उपलब्ध करुन देण्याची कार्यवाही दोन्ही अभिकर्ता संस्था व संबंधित जिल्हा पुरवठा अधिकारी यांनी रोजच्या रोज करावी व ती संबंधित क्षेत्रीय व्यवस्थापक, भारतीय अन्न महामंडळ यांना उपलब्ध करुन द्यावी. भरडाई देयकाची अदायगी (PFMS) पोर्टलच्या माध्यमातून करण्यात यावी. **(जोडपत्र-३)**

२२.२ किमान आधारभूत किंमत खरेदी व भरडाई योजनेंतर्गत खरेदीबाबतची सर्व माहिती केंद्र शासनाच्या National Procurement Portal (NPP) वर भरावयाची असून सदर माहितीसद्य:स्थितीत NeML यांच्या पोर्टलमार्फत अद्ययावत करण्यात येते. याकरिता योजनेशी संबंधित अभिकर्ता संस्था, त्यांनी नियुक्त केलेल्या उप अभिकर्ता संस्था, गिरणीधारक व जिल्हा पुरवठा अधिकारी यांनी त्यांच्याशी निगडीत असलेली माहिती NeML पोर्टलवर अद्ययावत करावी. सदर माहिती पोर्टलवर ऑनलाईन अद्ययावत न केल्यास गिरणीधारक/ अभिकर्ता संस्था यांना कोणतेही देयक वित्तीय सल्लागार व उपसचिव कार्यालयाकडून अदा करण्यात येणार नाही. त्याचप्रमाणे अभिकर्ता संस्थांनी PFMS पोर्टलवर त्यांच्याशी संबंधित सर्व माहिती अद्ययावत करावी.

२३ **<u>ॲडव्हान्स सी.एम.आर:-</u>**

पणन हंगाम २०२१-२२ मध्ये धान भरडाईची गती वाढविण्यासाठी प्रचलित पद्धतीनुसार ॲडव्हान्स सी.एम.आर. स्वीकृत करण्यात यावा. त्यासाठी प्रत्येक वेळी एका मिलरचा १० लॉट तांदूळ स्वीकृत करण्यात यावा. तथापि, तांदळाच्या गुणवत्तेबाबतचे केंद्र शासनाचे सर्व निकष पाळले जातील याची दक्षता संबंधित जिल्हाधिकारी यांनी घेणे आवश्यक आहे. त्याचप्रमाणे ॲडव्हान्स सी.एम.आर. जमा करणाऱ्या मिलर्सनी ज्या प्रमाणात ॲडव्हान्स सी.एम.आर. जमा

केला आहे त्या प्रमाणात तात्काळ धानाची उचल केली असल्याची खातरजमा दोन्ही अभिकर्ता संस्था तसेच संबंधित जिल्हाधिकारी यांनी करावी.

**सर्वसाधारण सूचना -**

१) तांदूळ लक्ष्य निर्धारित सार्वजनिक वितरण व्यवस्थेमध्ये वितरित केल्यानंतर दरमहा प्रमाणपत्रे जिल्हा पुरवठा अधिकारी कार्यालयाने वित्तीय सल्लागार व उपसचिव, मुंबई यांच्या कार्यालयास सादर करावीत. (नमूना जोडपत्र -५ मध्ये पहावा.)

२) सीएमआर जमा करण्यासाठी भाडयाने घेतलेल्या गोदामामध्ये एकदा साठा केलेला सीएमआर २ महिन्यापेक्षा अधिक काळ सदर गोदामात राहणार नाही याची दक्षता घेण्यात यावी.

३) सीएमआरच्या साठवणूक व वितरणाच्या कार्यवाहीबाबत स्वतंत्रपणे निदेश देण्यात येतील.

४) तांदळाचे प्रत्यक्ष लक्ष्य निर्धारित सार्वजनिक वितरण व्यवस्थेमधील वितरण व त्याचे उपयोगिता प्रमाणपत्र जिल्हा पुरवठा अधिकारी यांनी सादर करावे.

५) शासनाने विहित केलेले गोदाम व शासकीय गोदाम येथील गुणवत्ता नियंत्रणाची जबाबदारी संबंधित जिल्हा पुरवठा अधिकारी यांची राहील.

वरील शासन परिपत्रक, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर असून त्याचा संकेतांक २०२११०१४१८४५३३३९०६ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sudhir Deodatta Tungar

Digitally signed by Sudhir Deodatta Tungar
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=FOOD CIVIL SUPPLIES AND CONSUMER PROTECTION DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=8b555e4e3006da7480655b52484794686f18de73c0aa909267b188c86a755c75, pseudonym=5E1F07FF6933630D1833271F4B68D3392A0A1127, serialNumber=204E151470E2D21694C51F66F9B5A8FAAE544D15F6BFA4851335010591835680, cn=Sudhir Deodatta Tungar
Date: 2021.10.14 18:49:09 +05'30'

**( सुधीर तुंगार )**
**शासनाचे सह सचिव**

**सहपत्रे:**- जोडपत्र १ ते ५

**प्रति,**

१) व्यवस्थापकीय संचालक,महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ,कनमुर हाऊस, मुंबई-४०० ००१.

२) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी आदिवासी विकास महामंडळ मर्या., आदिवासी विकास भवन,जुना आग्रा रोड, नाशिक - ४२२ ००१.

३) जिल्हाधिकारी, सर्व.

४) वित्तीय सल्लागार व उपसचिव, अन्न, नागरी पुरवठा मुंबई.

५) जिल्हा पुरवठा अधिकारी,सर्व.

६) सहायक जिल्हा पुरवठा अधिकारी,सर्व.

७) सर व्यवस्थापक (महाराष्ट्र) ,भारतीय अन्न महामंडळ, ५ वा माळा, दत्तपाडा रोड, राजेंद्र नगर, बोरीवली (पूर्व), मुंबई-४०००६६

८) उपआयुक्त (पुरवठा), सर्व विभाग.

**प्रत माहितीसाठी अग्रेषित :-**

१) मा.विरोधी पक्षनेता विधानसभा/विधान परिषद

२) सर्व विधान परिषद सदस्य व विधान सभा सदस्य.

३) प्रधान सचिव, (पणन), सहकार, पणन व वस्त्रोदयोग विभाग, मंत्रालय, मुंबई.

४) सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

५) सचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२

६) महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई (५ प्रती),

७) खाजगी सचिव, मा.मंत्री (अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण), मंत्रालय, मुंबई-३२.

८) मान्यताप्राप्त राजकीय पक्षांची कार्यालये, (प्रत्येकी ५ प्रती),

९) ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ग्रंथालय ६ वा मजला, विधानभवन, मुंबई. (१० प्रती)

१०) संचालक, दि महाराष्ट्र स्टेट को-ऑपरेटिव्ह मार्केटिंग फेडरेशन, मुंबई.

११) संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी आदिवासी विकास महामंडळ मर्यादित, नाशिक.

## जोडपत्र क्रमांक -१

### धान/तांदुळ वाहतुकीचा तपशील दर्शविणारे विवरणपत्र

| अ.क्र | जिल्ह्याचे नाव | धान खरेदी केंद्राचे नाव | भरडाई केंद्राचे नाव | डिओ. क्र.व दिनांक | टि.पी. क्र. व दिनांक | भरडाई साठी दिलेला निव्वळ धान (क्विं) | खरेदी केंद्र ते मिल पर्यंतचे अंतर | ८ किमी पेक्षा कमी असणाऱ्या वाहतूकीसाठी दर (रु./क्विं.) | ८ किमी पेक्षा कमी असणाऱ्या वाहतूकीची रक्कम | ८ किमी पेक्षा जास्त असणाऱ्या वाहतूकीसाठी दर (रु./क्विं.) | ८ किमी पेक्षा जास्त असणाऱ्या वाहतूकीचे अंतर (कि.मी.) | ८ किमी पेक्षा जास्त असणाऱ्या वाहतूकीची रक्कम | एकूण वाहतूकीची निव्वळ देय रक्कम (रु.) |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९=६*८ | १० | ११ | १२=६*१०*११ | १३=९+१२ |
| | | | | | | | | | | | | | |

## जोडपत्र-२

## कलर कोडिंग - खरीप पणन हंगाम २०२१-२२ साठी



Immediate

No.15-35/2020.Py.III (E.373783)
Government of India
Ministry of Consumer Affairs, Food & Public Distribution
Department of Food & Public Distribution
****

Krishi Bhavan, New Delhi.
Date: 29/04/2021

To

The Secretary, Food & Civil Supplies Department,
Government of Andhra Pradesh, Assam, Bihar, Chhattisgarh, Gujarat, Haryana, Himachal Pradesh, Jammu & Kashmir, Jharkhand, Karnataka, Madhya Pradesh, Maharashtra, Nagaland, Tripura, Orissa, Punjab, Rajasthan, Tamil Nadu, Telangana, Uttaranchal, Uttar pradesh, West Bengal, Andaman & Nicobar Islands, Chandigarh, Delhi and Puducherry.

Subject: Colour Coding of Gunny Bags to facilitate identification of crop year of stock for KMS 2021-22.

Sir/ Madam,

I am directed to say that it has been decided with the approval of Competent Authority to adopt **BLUE** colour coding for gunny bags for KMS 2021-22. The colour coding will be in the manner as indicated below:

1. Stencil or Branding as per indenters' requirements shall be in **"BLUE"** colour
2. Marking or stitching on the mouth of the bag after filling the grain will be done by the FCI/State Agencies in **"BLUE"** colour.
3. For identification marking of marketing season, there will be color coded strip/s on every jute bag. Width of each strip will be of 4 threads. Each strip will be running along the length of the Bag and shall be in **"BLUE"** color.

**For bags to be supplied through Jute Commissioner of India.**

4. (I) Single strip is to be printed for bags to be supplied through Jute

commissioner of India. This single strip shall be printed at a distance of about 150 mm away from any selvedge of the bag.

4. (ii) For supply of jute bags to Andhra Pradesh, Telangana, Tamil Nadu, Kerala and Karnataka through Jute Commissioner of India, an additional **Black colour strip** will be printed on each bag at a distance of about 150 mm away from other selvedge of the bag.

**For bags not purchased through Jute Commissioner of India.**

5. For jute bags not purchased through Jute Commissioner of India, two strips shall be printed on each bag. Each of two strips shall be printed at a distance of about 150 mm away from the respective selvedges of each bag.

6. This issues with the approval of the competent authority.

Yours faithfully

(Inderdeep Kandwal)
Under Secretary (Py.III)
Ph: 011-23384448

Copy to

1. Chairman, FCI, New Delhi.
2. ED (Proc) FCI, New Delhi.
3. Jute Commissioner, Kolkata
4. Chairman, IJMA, Kolkata.

जोडपत्र क्रमांक -३

२१

जोडपत्र - ५

U.K.S. Chauhan, *IAS*
Joint Secretary (Policy&FCI)
Ph. No.: 2338 2512
Fax No.: 2338 9358
Email: jspolicy.fpd@nic.in

सत्यमेव जयते

संयुक्त सचिव
भारत सरकार
उपभोक्ता मामले, खाद्य और सार्वजनिक वितरण मंत्रालय
खाद्य और सार्वजनिक वितरण विभाग
कृषि भवन, नई दिल्ली - 110001
JOINT SECRETARY
GOVERNMENT OF INDIA
MINISTRY OF CONSUMER AFFAIRS,
FOOD & PUBLIC DISTRIBUTION
DEPARTMENT OF FOOD AND PUBLIC DISTRIBUTION
KRISHI BHAWAN, NEW DELHI-110001

D.O.No.17(16)/2013-Py.I

October 7, 2013

Dear Mr. Deepak,

As you are aware, there are gaps in the flow of information about the procurement operations on day-to-day basis in various States in a particular season, which results in reporting of incorrect data of Central Pool procurement at various levels.

2. To overcome this problem, this Department has requested FCI to evolve an online procurement monitoring system (OPMS) for reporting and monitoring of procurement operations for wheat, paddy and coarse grains in the country on daily basis. Following data is planned to be managed through OPMS-

| | |
|---|---|
| **I** | **District level data**<br>(to be filled by Revenue District Level Officers of various state agencies and Area Managers of FCI) |
| (i) | Commodity-wise total quantity procured in various Revenue Districts by each state agency or FCI on daily basis |
| (ii) | Commodity-wise quantity of procured stock of each commodity handed over to FCI in various Revenue Districts by the concerned state agency on daily basis (delivery of CMR in the case of procurement of paddy) |
| (iii) | Delivery of levy rice to FCI/state nodal agency by the millers in various Revenue Districts on daily basis (to be reported by the Area Managers or Revenue District-level Officers of the concerned state nodal agency) |
| (iv) | Entry of historical data of procurement for various commodities for previous two seasons, Revenue District-wise |
| **II** | **Data entry at State Level** |
| (i) | Names, addresses and details of contact persons of various state agencies involved in procurement operations in the State (one-time entry to be updated from time to time) |
| **III** | **Report generation** |
| | Software system should facilitate generation of following kinds of reports |
| (i) | District-level reports of procurement of each commodity by various agencies including FCI |
| (ii) | State-level reports of Revenue District-wise and agency-wise progress of procurement for various commodities |
| (iii) | Comparative reports on procurement operations for various commodities for the current and two previous years, Revenue District-wise |
| (iv) | Generation of national-level reports regarding on-going procurement operations for various commodities, state-wise and also comparative reports on procurement for the current season and two previous seasons |

Contd/-

एच-४०३३[५००-११-२०१४]-११

3 It is planned that to begin with, the Area Managers of FCI will be feeding the data pertaining to all State Government agencies as well as of FCI on OPMS on day-to-day basis. For this purpose, it would be necessary that all the State agencies of your State, involved in procurement of wheat, paddy or coarse grains, designate one officer as Nodal Officer in each revenue District in the area of their operations and instruct that Nodal Officer to provide all required data through e-mail/fax or over phone to the concerned Area Manager of FCI on day-to-day basis so that data is continuously updated in OPMS without break or time lag. As operations of KMS 2013-14 have started, it is requested that immediate instructions may be given to all State agencies in this regard and they should immediately start providing required information to the Area Managers of FCI. In case there is any backlog of data for the current KMS, that may also be kindly provided by the Nodal Officers of the State procurement agencies to the Area Managers of FCI for making entries in OPMS.

4. In the next phase, we will be enabling the Nodal Officers of the State Government agencies themselves to feed the data in OPMS on day-to-day basis. For that purpose, a list of these Nodal Officers will be prepared and they will be provided login ID and password by NIC.

5. Considering the importance of the matter, your immediate attention and kind cooperation is solicited in this regard.

With regards,

Yours sincerely,

(U.K.S. Chauhan)

Shri Deepak Kapoor
Food Secretary,
Government of Maharashtra,
Department of Food & Public Distribution
Mantralaya Annexe,
Mumbai - 400032

एच-१७३३ -११अ

२३

**MOST IMMEDIATE**

No.192(29)/2007-FC.A/cs
Government of India
Ministry of Consumer Affairs, Food and Public distribution
Department of Food and Public Distribution

Krishi Bhavan, New Delhi
Dated the August 19, 2015

To

(1) The Principal Secretary/Secretary,
Food & Civil Supplies Department,
Governments of Andhra Pradesh, Assam, Bihar, Telangana, Chhattisgarh, Gujarat, Jharkhand, Karnataka, Kerala, Madhya Pradesh, Maharashtra, Orissa, Punjab, Rajasthan, Tamil Nadu, Uttar Pradesh, Uttarakhand and West Bengal.

(2) CMD, FCI, New Delhi

Subject: Procedure for submission of accounts, audited by auditors appointed by C&AG by State Governments in order to finalize procurement incidentals of State Agencies and economic cost of rice, wheat and coarse grains for the past years

Madam/Sir,

I am directed to refer to this Department's letter of even number dated 08.12.2008 and 16.09.2010 on the above subject vide which procedure for submission of final claims by the States and time limit for sending FCI's comments thereon was fixed to avoid delay and expedite finalization of accounts. Subsequently, keeping in view the inconvenience being faced by some State Governments and also simplify the procedure for expeditious submission of proposal for fixation of final rate of procurement incidentals/economic cost vide Joint Secretary(Policy & FCI)'s D.O. letter of even number dated 27.12.2013, proforma was partially modified to enable the States to submit the information expeditiously. Further, vide letter of even number dated 25.2.2015, State Governments were informed that the proforma circulated vide letter dated 27.12.2013 will be effective from prospective date.

2. Subsequently, while finalizing the proposals of some States, it has been observed that the documents required to be submitted along with proposal for fixation of final rate of procurement incidentals/economic cost still requires further modification. Similarly, it has also been observed that in case of heads like administrative charges, the items which should be booked or not to be booked are not quite clear. Accordingly, matter has been further examined in the Department and it has been decided to circulate a list indicating the documents which must be submitted along with the proposal to enable PI Cell of this Department to examine the proposal expeditiously and recommend realistic rates of various items of procurement incidentals. A list of documents required to be submitted along with the proposals (**Annex-I**) along with an illustrative list of items

एच-१७३३ -१२

which should be booked and not to booked under the head "Administrative Charges" is given at **Annex-II**. It may be noted that the list of documents is not exhaustive and, whenever required to prove the veracity of a claim, production of more documents will be insisted upon by the Department.

3. All State Governments are requested to strictly follow the guidelines given in para 2 above and issued earlier from time to time while submitting their proposals for fixation of final rates of procurement incidentals/economic cost.

4. While examining the proposals and sending their comments to this Department, all Regional Offices of FCI and FCI Headquarters are also requested to ensure that the proposals to be submitted by the State Governments in future should be in accordance with aforesaid instructions.

Yours faithfully,

( Manoj Kr. Gupta )
Director
Tel.No.011-2338 9436
Fax No.011-2338 9358

Copy to: ED (Proc), FCI HQ, New Delhi with a request to circulate it to all ED (Zones)/GM (Regions) for strict adherence to the above procedure.

----------

एव-१७३३ -१२अ.

जोडपत्र क्रमांक -४

तांदुळ विश्लेषण अहवाल

(ANALYSIS REPORT OF RICE)

दिनांक:-

भाग “अ”

| मानके (REFRACTION) | टक्केवारी (PERCENTAGE) |
|---|---|
| १. तुटलेले दाणे (Broken) | |
| अ) १/८ ते १/४ पर्यंत (Over १/८ the to below १/८) | |
| ब) १/४ ते ३/४ पर्यंत | |
| २. अन्य घटक (Foreign Matter) | |
| अ) सेंद्रिय (Organic) | |
| ब) असेंद्रिय (Inorganic) | |
| ३. क्षतिग्रस्त दाणे (Damaged Grains) | |
| ४. रंगहिन दाणे (Discolored Grains) | |
| ५. पांढरके दाणे (Chalky Grains) | |
| ६. लाल दाणे (Red Grains) | |
| ७. कमी दर्जाचे मिश्रीत दाणे (Admixture of lower Classes) | |
| ८. छिलका असलेले दाणे (Husky Grains) | |
| ९. ओलावा (Moisture Content) | |

भाग “ब”

| |
|---|
| १. भात गिरणीचे नाव व पत्ता -: ........................................................................... |
| २. गुणवत्ता तपासणी केलेल्या तांदुळाचे एकुण पोते व वजन................................................................................ |
| ३. स्विकृती पावती क्रमांक व दिनांक.................................................................... |

(स्वाक्षरी)

गुणवत्ता नियंत्रक तथा

प्राधिकृत उचल/वाहतुक प्रतिनिधी

जिल्हा..................................

क्रमांक-.........

## तांदुळ स्विकृती पावती

संदर्भ:-१) शासन निर्णय क्रमांक

दिनांक:- / /

A. हंगाम :-
B. यंत्रणेचे नाव :-
C. जिल्हा :-
D. भात गिरणीचे नाव व पत्ता :-

| अ.क्र. | तारीख | वाहन क्रमांक | गुणवत्ता तपासणी दिनांक | ज्या गोदामात तांदुळ पाठविण्यात आला त्या गोदामाचे नाव | तांदळाची प्रत | एकुण बारदाना संख्या | तांदळाचे निव्वळ वजन क्विंटल | शेरा |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ |
| | | | | | | | | |
| | | | | | | | | |
| | | | | | | | | |

प्रमाणित करण्यात येते की, वर दर्शविलेली बारदाना संख्या .............एवढी असुन प्रती बारदाना वजन ५८० ग्रॅम प्रमाणे एकुण बारदान्याचे होणारे वजन .............. कमी करुन तांदळाचे निव्वळ वजन दर्शविले आहे.

गिरणी मालकाचे नाव
अधिकारी........
व सही

जिल्हापुरवठा
यांचे प्राधिकृत प्रितिनिधीचे
नाव व सही

# जोडपत्र-५

## प्रमाणपत्र

याद्वारे प्रमाणित करण्यात येते की,

१. आधारभूत किंमत योजनेंतर्गत खरेदी करण्यात आलेल्या धानाची भरडाई करुन प्राप्त CMR पैकी माहे --------------- ,२०२० मध्ये ---------------------- मे.टन CMR वितरित करण्यात आला आहे.

२. उपरोक्त नमूद केलेला सीएमआर हो गुणवत्ता तपासणी करुन घेण्यात आला असून एफ ए क्यु दर्जाचा आहे.

३. सदर CMR महाराष्ट्र शासन व अन्न व सार्वजनिक वितरण विभाग, भारत सरकार मधील सामंजस्य करारानुसार राष्ट्रीय अन्न सुरक्षा योजना, अंत्योदय योजना, इतर कल्याणकारी योजनेच्या लाभार्थ्यांनाच वितरित करण्यात आला आहे.

४. तसेच, उपरोक्त नमूद परिमाण हे पूर्णत : DCP अंतर्गत प्राप्त CMR चे असून यात भारतीय अन्न महामंडळाकडून उचल केलेल्या तांदूळाचा समसावेश नाही.

५. सदर तांदूळ हा बंदिस्त गोदामात साठवणूक करण्यात आलेला होता.

**जिल्हा पुरवठा अधिकारी/ अन्नधान्य वितरण अधिकारी**

# जोडपत्र-६

(खरीप हंगाम २०२१-२२ मध्ये खरेदी करावयाच्या भाताचे (धानाचे ) विनिर्देश )

ANNEXURE-"I"

UNIFORM SPECIFICATIONS OF ALL VARIETIES OF PADDY

(KHARIF MARKETING SEASON 2021-22)

Paddy shall be in sound merchantable condition, dry, clean, wholesome of good food value, uniform in colour and size of grains and free from moulds, weevils, obnoxious smell, *Argemone mexicana, Lathyrus Sativus* (Khesari) admixture of deleterious substances.

Paddy will be classified into Grade 'A' and 'Common' groups.

SHEDULE OF SPECIFICATION

| Sr. No. | Refractions | Maximum Limits (% ) |
|---|---|---|
| 1 | Foreign matter<br>a) Inorganic<br>b) Organic | <br><br>1.0<br>1.0 |
| 2 | Damaged, discoloured, sprouted and weevilled grains | 5.*0 |
| 3 | Immature, Shrunken and shrivelled grains | 3.0 |
| 4 | Admixture of lower class | 6.0 |
| 5 | Moisture content | 17.0 |

* Damaged, sprouted and weevilled grains should not exceed 4%

**N.B.**

1. The definitions of the above refractions and method of analysis are to be followed as per BIS 'Method of analysis for food grains' Nos. IS: 4333 (Part-I) : 1996, IS : 4333 (Part-II) : 2002, and "Terminology for food grains" IS: Nos. 2813 - 1995, as amended from time to time.
2. The method of sampling is to be followed as per BIS method for sampling of Cereals and Pulses IS: 14818 - 2000 as amended from time to time.
3. Within the overall limit of 1.0% for organic foreign matter, poisonous seeds shall not exceed 0.5% of which Dhatura and Akra seeds (*Vicia* species) not to exceed 0.025% and 0.2% respectively.

******

# जोडपत्र-७

(खरीप हंगाम २०२१-२२ मध्ये खरेदी करावयाच्या तांदूळाचे विनिर्देश)

UNIFORM SPECIFICATION FOR GRADE 'A' & 'COMMON' RICE
(KHARIF MARKETING SEASON 2021-22)

Rice shall be in sound merchantable condition, sweet, dry, clean, wholesome, of good food value, uniform in colour and size of grains and free from moulds, weevils, obnoxious smell, admixture of unwholesome poisonous substances, *Argemone maxicana* and *Lathyrus sativus* ( Khesari) in any form, or colouring agents and all impurities except to the extent in the schedule below. It shall also conform to pprescribed norms under food Safety & Standards Act, 2006/ Rules prescribed here under:

SCHEDULE OF SPECIFICATION

| sr.no | Refractions | | Maximum limit (%) | |
|---|---|---|---|---|
| | | | Grade A | Common |
| 1 | Broken* | Raw | 25.00 | 25.00 |
| | | Parboiled/single parboiled rice | 16.0 | 16.00 |
| 2 | Foreign matter ** | Raw/ Parboiled/single parboiled rice | 0.5 | 0.5 |
| 3 | Damaged#/Slightly Damaged Grains | Raw | 3.0 | 3.0 |
| | | Parboiled/single parboiled rice | 4.0 | 4.0 |
| 4 | Discoloured Grains | Raw | 3.0 | 3.0 |
| | | Parboiled/single parboiled rice | 5.0 | 5.0 |
| 5 | Chalky Grains | Raw | 5.0 | 5.0 |
| 6 | Red Grains | Raw/ Parboiled/single parboiled rice | 3.0 | 3.0 |
| 7 | Admixture of lower class | Raw/ Parboiled/single parboiled rice | 6.0 | - |
| 8 | Dehusked Grains | Raw/ Parboiled/single parboiled rice | 13.0 | 13.0 |
| 9 | Moisture content @ | Raw/ Parboiled/single parboiled rice | 14.0 | 14.0 |

* Not more than 1% by weight shall be broken.

** Not more than 0.25% by weight shall be mineral matter and not more than 0.10% by weight shall be impurities of animal origin.

# including pin point damage grains.

@ Rice (both raw and parboiled) can be procured with moisture content upto a maximum limit of 15% with value cut. There will be no value cut up to 14%. Between 14% to 15% moisture, value cut will be applicable at the rate of full value.

****

NOTES APPLICABLE TO THE SPECIFICATION OF GRADE 'A' AND COMMON VARIETIES OF RICE

1. The definition of the above refractions and method of analysis are to be followed as given in Bureau of Indian Standard "Method of analysis for Food grains" No. IS: 4333(Part-I) 1996 and IS: 4333(Part-II) 2002 and ‘‘Terminology for food grains’’ IS: 2813-1995 as amended from time to time. Dehusked grains are rice kernels whole or broken which have more than 1/4 th of the surface area of the kernel covered with the bran and determined as follows:-

ANALYSIS PROCEDURE: - Take 5 grams of rice (sound head rice and broken) in a petri dish (80 X 70mm). Dip the grains in about 20 ml. of Methylene Blue solution (0.05% by weight in distilled water) and allow to stand for about one minute. Decant the Methylene Blue solution. Give a swirl wash with about 20 ml. of dilute hydrochloric acid (5% solution by volume in distilled water). Give a swirl wash with water and pour about 20 ml. of Metanil Yellow solution (0.05% by weight in distilled water) on the blue stained grains and allow to stand for about one minute. Decant the effluent and wash with fresh water twice. Keep the stained grains under fresh water and count the dehusked grains. Count the total number of grains in 5 grams of sample under analysis. Three broken are counted as one whole grain.

CALCULATIONS:

$$\text{Percentage of Dehusked grains} = \frac{N \times 100}{W}$$

Where N = Number of dehusked grains in 5 grams of sample

W = Total grains in 5 grams of sample.

2. The Method of sampling is to be followed as given in Bureau of Indian Standard "Method of sampling of Cereals and Pulses" No. IS: 14818-2000 as amended from time to time.

3. Brokens less than 1/8th of the size of full kernels will be treated as organic foreign matter. For determination of the size of the brokens average length of the principal class of rice should be taken into account.

4. Inorganic foreign matter shall not exceed 0.25% in any lot, if it is more, the stocks should be cleaned and brought within the limit. Kernels or pieces of kernels having mud sticking on surface of rice, shall be treated as Inorganic foreign matter.

5. In case of rice prepared by pressure parboiling technique, it will be ensured that correct process of parboiling is adopted i.e. pressure applied, the time for which pressure is applied, proper gelatinisation, aeration and drying before milling are adequate so that the colour and cooking time of parboiled rice are good and free from encrustation of the grains.

-----------------------

**STANDARDS OF RISE FOR ISSUE TO STATE GOVERNMENTS/UT ADMINISTRATIONS FOR DISTRIBUTION UNDER TPDS AND OTHER WELFARE SCHEMES.**

Guidelines for issue/ disposal of wheat and rise have been issued vide Departments letter no. 8-2/98-DR III dated 27.01.1998 and 13.11.1998. Gist of standards of rise for issue to states / UTs for distribution under TPDS and OWSs along with undated illustrations for KMS 2018-19 is as under :

1. Ready issuable stocks are fit for human consumption which should conform the standards of Food Safety and Standards Act and Rules framed there under.

2. Rise stocks falling within A, B and C categories (categorization is best on damaged and discoloured grains) confirming to food safety norms and free from insect infestation are ready stocks. Ready stocks may be issued under TPDS and OWSs provided the refractions in respect of broken grains, chalky grains, red grains and dehusked grains are up to 20% in excess of the uniform specifications.

Illustration of maximum permissible parameters of ready to issue stocks of rise based on uniform specifications for KMS 2021-22 is as under:

| sr.no | Refractions | | Maximum limit (%) as per uniform specifications for Grade A & Common | Maximum permissible limit (%) for Grade A & Common |
|---|---|---|---|---|
| 1 | Damaged#/Slightly Damaged Grains/Pin-point Damaged grains | Raw | 3 | 5 |
| | | Parboiled/single parboiled rice | 4 | 5 |
| 2 | Discoloured Grains | Raw | 3 | 7 |
| | | Parboiled/single parboiled rice | 5 | 7 |
| 3 | Broken | Raw | 25 | 30 |
| | | Parboiled/single parboiled rice | 16 | 19 |
| 4 | Chalky Grains | Raw | 5 | 6 |
| 5 | Red Grains | Raw/ Parboiled/single parboiled rice | 3 | 4 |
| 6 | Dehusked Grains | Raw/ Parboiled/single parboiled rice | 13 | 16 |
| 7 | Foreign matter ** | Raw/ Parboiled/single parboiled rice | 0.5 | 1.0 |